कृषि यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाचा निधीपैकी रु.१००० लक्ष निधी वितरीत करणे....

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं- ०५२०/प्र.क्र.५९/१४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०८ सप्टेंबर, २०२०

**संदर्भ:-**

१) केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T (I&P), दि.२७ मे, २०२०.
२) केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.DO.३-६ (KKA-III)/२०२०-M&T (I&P), दि. ८ जून, २०२०.
३) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.०५२०/प्र.क्र.५९/१४-अे, दि-१४ जुलै, २०२०.
४) आयुक्त कृषि यांचे पत्र क्र.जा.क्र.कयांउअ/२०२०-२१/गुनि-५/१६५८४/२०२०, दि.१५/७/२०२०.

**प्रस्तावना:**

राज्यात केंद्र पुस्कृत कृषि यांत्रिकीकरण उप- अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियांनातर्गत एकूण आठ घटक असून, घटक क्र.१ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेलया संयंत्राची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणीबाबत आहेत. घटक क्र.१ व २ यासाठी केंद्र हिश्श्याचे प्रमाण १००% आहे. उर्वरित ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधीच्या हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन दिनांक २७ मे, २०२० च्या पत्रान्व्ये, कृषि यांत्रिकीकरण उप अभियानासाठी केंद्र हिस्सा रु.३७५० लक्ष व समरुप राज्य हिस्सा रु.२५०० लक्ष अशा एकूण रु.६२५० लक्ष रकमेच्या कार्यक्रमास मान्यता दिली आहे. संदर्भाधीन दि. ८ जून, २०२० च्या पत्रान्वये नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली या चार आकांक्षित जिल्हयांसाठी केंद्र हिस्सा रु.३०७.२० लक्ष व राज्य हिस्सा रु.२०४.८० लक्ष अशा एकूण ५१२ लक्ष रक्कमेच्या कार्यक्रमास मान्यता दिली आहे. अशा प्रकारे सन २०२०-२१ या वर्षासाठी एकूण रु.६७६२ लक्ष रक्कमेच्या कार्यक्रमास मान्यता देवून केंद्र हिश्श्याच्या रु.४०५७.२० लक्ष निधी वितरीत केला आहे. वितरीत निधीमध्ये सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.३१५७.२० लक्ष, अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु.६०० लक्ष व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रु.३०० लक्ष एवढ्या निधीचा समावेश आहे. सर्वसाधारण प्रवर्गासाठी प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या रु.३१५७.२० लक्ष निधीपैकी रु.६०० लक्ष

व त्यास समरुप राज्य हिस्सा रु.४०० लक्ष असा एकूण रु.१००० लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्या अनुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

१. या शासन निर्णयान्वये, कृषि यांत्रिकीकरण उप- अभियानांतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याचा रुपये ६०० लक्ष (अक्षरी रु.सहा कोटी फक्त) व समरुप राज्य हिश्श्याचा रु.४०० लक्ष (अक्षरी रु.चार कोटी फक्त) असा एकूण रु.१००० लक्ष (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला रु.१००० लक्ष निधी (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) निधी खालील लेखाशीर्षखाली चालू वर्षी अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

| केंद्र | राज्य |
|---|---|
| मागणी क्रमांक :- डी-३,<br>२४०१- पीक संवर्धन,<br>(००) ११३- कृषि अभियांत्रिकी<br>(००) (०८) कृषि उन्नती योजना कृषि अभियांत्रिकीकरण उप अभियान(कें.पु.यो.), (केंद्र हिस्सा-६०%)<br>(२४०१२५१३), ३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक :- डी-३,<br>२४०१- पीक संवर्धन,<br>(००) ११३- कृषि अभियांत्रिकी<br>(००) (१६) कृषि उन्नती योजना कृषि अभियांत्रिकीकरण उप अभियान(कें.पु.यो.), (राज्य हिस्सा-४०%)<br>(२४०१८७३६), ३३ अर्थसहाय्य |

३. सदर निधीचा विनियोग सन २०१९-२० या वर्षातील प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्यासाठी करण्यात यावा.

४. सदर निधीमधून ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुदानाचे वाटप करतांना दि.२७ जुलै, २०१९ च्या शासन निर्णयान्वये ठरवून दिलेल्या मर्यादेत अनुदान देण्यात यावे.

५. इतर यंत्र/अवजारांच्या बाबातीत कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना व संदर्भाधीन केंद्र शासनाच्या दि.२ जुलै, २०१९ च्या पत्रातीत सूचना, अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपद्धती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/ प्रकियाचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/C.V.C.तत्वानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन

नियम/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

७. निधी आहरण व संवितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे:-

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संविरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१) कृषि, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी. | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने व वित्त विभागाने त्यांचा अनौ. संदर्भ क्र.१६०/ २०२०/व्यय-१/दि.३१.८.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०८१३१४५२८७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.09.08 16:58:36 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (कृषी), मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा.राज्यमंत्री (कृषी), मंत्रालय, मुंबई-३२.
३) सर्व सन्माननीय विधी मंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
४) सचिव (कृषी), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय, मुंबई-३२.
७) सर्व संचालक/सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.

८) विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
९) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , मुंबई/नागुपर (लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता)
११) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई-३२.
१३) वित्त विभाग(व्यय-१ व अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई-३२.
१४) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
१५) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
१६) निवड नस्ती (कार्यासन-१४अे).